महाराष्ट्र राज्यातील सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका यांच्या सतत व समवर्ती लेखापरिक्षणासाठी निर्माण केलेली अस्थायी पदे दिनांक ०१.०३.२०१५ ते ३०.०९.२०१५ पर्यत चालू ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक मुदत ०४१५/प्र.क्र.१३२/२-स,**
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : २० मे २०१५.

वाचा:- १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र असक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४.
२) शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, क्र राजस १००८/प्र.क्र.५३८/५-स, दिनांक ०५.०५.२०११.
३) शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, क्र डिसीबी १२११/प्र.क्र.३६२/२-स, दिनांक १९.९.२०१३
४) शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, क्र डिसीबी १२११/प्र.क्र.३६२/२-स, दिनांक १६.७.२०१४.
५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालय यांची पत्रे
अ) जा.क्र.२५५ आस्थापना/कक्ष-१/जिमस बँक/मुदतवाढ/२०१५, दि. २३.३.२०१५
ब) जा.क्र.सआ/लेप/जिमस/अस्थायी/पपुचा/२०१५-१६/२०१५ दि. ११.३.२०१५,
क) जा.क्र.सआ/लेप-१७ /अस्थायी/पपुचा/२०१५-१६/२०१५/३२१ दि.१७.०४.२०१५,

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्र २ अन्वये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील स्थायी / अस्थायी पदांच्या आढाव्यानुसार सहकार विभागाचा सुधारीत आकृतीबंध शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. राजस/१००८/ प्रक्र ५३८/ ५-स, दि. ५ मे २०११ अन्वये निश्चित करण्यात आला असून सदर आकृतीबंधामध्ये प्रस्तुत ४९० पदांचा समावेश आहे. तसेच उपरोक्त संदर्भ क्र ४ अन्वये सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांच्या सतत व समवर्ती लेखापरिक्षणासाठी निर्माण करण्यात आलेल्या ४९० पैकी ३२ अस्थायी पदांना दि.२८/०२/२०१५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासनाने मंजूरी दिलेली होती. सदरची मुदत वाढ संपुष्टात आली आहे. त्या अनुषंगाने सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांच्या सतत व समवर्ती लेखापरिक्षण योजना राबविणेबाबत लेखापरिक्षणासाठी निर्माण केलेली ४९० पैकी ५१ अस्थायी पदे सन २०१५-१६ मध्ये दिनांक १/३/२०१५ ते २८/२/२०१६ या कालावधीसाठी पुढे चालू ठेवण्याबाबत ९७ व्या घटनादुरुस्तीच्या अनुषंगाने लेखापरीक्षण विभागास आवश्यकतेनुसार काम

करण्यासाठी वर नमूद क्र. ५ मधील अ, ब, क च्या पत्रान्वये सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालयामार्फत प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

## शासन निर्णय :

उपरोक्त बाब विचारात घेऊन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था. महाराष्ट्र राज्य पुणे, यांच्या उपरोक्त वाचा क्र. ५ मधील अ,ब,क प्रस्तावानुसार सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांच्या सतत व समवर्ती लेखापरिक्षणासाठी निर्माण करण्यात आलेल्या ४९० पैकी ५१ अस्थायी पदांना **दि.१/०३/२०१५ पासून दि.३०/९/२०१५ पर्यंत या शासन निर्णयाव्दारे मुदतवाढीस मंजूरी देण्यात येत आहे.**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | विशेष लेखापरिक्षक वर्ग-१ | १५६००-३९१०० ग्रेड पे ५४०० | २१ |
| २ | विशेष लेखापरिक्षक वर्ग-२ | ९३००-३४८०० ग्रेड पे ४४०० | ०६ |
| ३ | लेखापरिक्षक, श्रेणी-१ | ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० | १४ |
| ४ | लेखापरिक्षक, श्रेणी-२ | ९३००-३४८०० ग्रेड पे ४२०० | १५५ |
| ५ | उपलेखापरिक्षक | ५२००-२०२०० ग्रेड पे २४०० | ६८ |
| ६ | कनिष्ठ लिपिक | ५२००-२०२०० ग्रेड पे १९०० | १९६ |
| ७ | शिपाई | ४४४०-७४४० ग्रेड पे १३०० | ३० |
| **एकूण पदे** | | | **४९०** |

उपरोक्त एकूण ४९० पैकी ५१ अस्थाई पदाचा होणारा खर्च हा सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मागणी क्र.व्ही-२ मधील अर्थसंकल्पीय लेखाशीर्ष " २४२५- सहकार (००) १०१- सहकारी संस्थांची लेखा परीक्षा - (०१)(०१) लेखापरीक्षेसाठी कर्मचारी वर्ग (२४२५ ०२२७), ०१-वेतन " या लेखाशीर्षाखाली सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठी केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. परंतू ही अस्थायी पदे विहीत पध्दतीने भरली आहेत या अटीच्या अधीन राहून ही मंजूरी देण्यात येत आहे.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. असंक-१००४/प्र.क्र.१२(भाग-२)/वित्तीय सुधारणा-१, दि. ०४.१०.२००४ अन्वये संबंधित प्रशासकीय विभागाना प्रदान केलेल्या मुदतवाढीच्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२७१८३६१३०४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Arun Patil

Digitally signed by Santosh Arun Patil
DN: CN = Santosh Arun Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Officer On Special Duty
Date: 2015.05.27 18:36:59 +05'30'

**(संतोष पाटील)**
**विशेष कार्य अधिकारी,**

**प्रत,**

१) महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
२) महालेखापाल-२, महाराष्ट्र (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) नागपूर.
३) वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई.
४) वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई.
५) कार्यासन अधिकारी, १७-स / ५-स / १२-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय. मुंबई.
६) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) सहनिबंधक, सहकारी संस्था, (लेखापरिक्षण) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
८) सह निबंधक, सहकारी संस्था (लेखा) महाराष्ट्र राज्य सहकारी बँक म., मुंबई
९) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
१०) विभागीय सहनिबंधक सहकारी संस्था (लेखापरिक्षण) (सर्व)
११) विभागीय विशेष लेखारिक्षक, सहकारी संस्था, मुंबई विभाग, मुंबई.
१२) जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व)
१४) जिल्हा विशेष लेखापरिक्षक, सहकारी संस्था (सर्व)
१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१७) व्यवस्थापक, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक म. (सर्व)
१८) सर व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक म., मुंबई.
१९) निवड नस्ती.